**मतदार मदत केंद्रांना (Voter Help Centres) मुदतवाढ देणे व सदर मतदार मदत केंद्रांवर आवश्यक मनुष्यबळ बाह्य यंत्रणेद्वारे घेणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्रमाांक:- ईएलआर-२०१९/प्र.क्र. ३५८/१९/३३,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- ३ जुलै, २०२४

वाचा :-

१. भारत निवडणूक आयोगाचे पत्र क्रमांक- २३/आयडी/२०१२/ईआरएस, दिनांक ९.४.२०१२.
२. शासन निर्णय क्र. ईएलआर २०१३/प्र.क्र. ११६/१३/३३, दिनांक २०.०२.२०१३.
३. शासन निर्णय क्र. ईएलआर २०१९/प्र.क्र. ३५८/१९/३३, दिनांक १५.०७.२०२२.
४. उद्योग, ऊर्जा व कामागार विभाग, शासन निर्णय क्र. काआआ-२०१३/प्र.क्र.२३३/कामगार-८, दिनांक १४.०३.२०२३.
५. उद्योग ऊर्जा व कामागार विभाग, शासन शुद्धीपत्रक क्र. काआआ-२०१३/प्र.क्र.२३३/कामगार-८, दिनांक ०९.०५.२०२३.
६. शासन निर्णय क्र. ईएलआर २०१९/प्र.क्र. ३५८/१९/३३, दिनांक ४.०७.२०२३.
७. उद्योग, ऊर्जा व कामागार विभाग, शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०१७/प्र.क्र.९३/कामगार-८, दिनांक ०६.०९.२०२३.
८. उद्योग, ऊर्जा व कामागार विभाग, शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०१७/प्र.क्र.९३/कामगार-८, दिनांक ३१.१०.२०२३.

**प्रस्तावना:**

भारत निवडणूक आयोगाच्या, उपरोक्त संदर्भ क्र.१ येथे नमूद पत्राच्या अनुषंगाने उपरोक्त संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये राज्यातील ३५९ तालुके व ज्या शहरांमध्ये लोकसंख्येच्या प्रमाणात अधिक केंद्रांची गरज आहे अशा शहरांच्या ९१ ठिकाणी मिळून एकूण ४५० मतदार मदत केंद्र, दिनांक १ मार्च, २०१३ ते दिनांक ३१ मार्च, २०१४ या कालावधीसाठी स्थापन करण्यात आलेली होती. सदर मतदार मदत केंद्रांना त्यापुढे एक-एक वर्षासाठी वेळोवेळी मुदतवाढ देण्यात आली आहे. तसेच या ४५० मतदार मदत केद्रांना उपरोक्त संदर्भ क्र.६ अन्वये दिनांक ३१ मार्च, २०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे.

लोकसभा सार्वत्रिक निवडणूका तसेच विधानसभा सार्वत्रिक निवडणूका विचारात घेऊन सदर मतदार मदत केद्रांना दि. ३१ डिसेंबर, २०२४ पर्यंत मुदतवाढ देण्याची व सदर मतदार मदत केंद्रांवर प्रत्येकी एक मनुष्यबळाचे काम (कामाच्या स्वरुपानुसार डाटा एन्ट्री ऑपरेटर) बाह्ययंत्रणेद्वारे घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

राज्यात ३५९ तालुके व ज्या शहरांमध्ये लोकसंख्येच्या प्रमाणात अधिक केंद्रांची गरज आहे अशा शहरांच्या ९१ ठिकाणी मिळून ४५० मतदार मदत केंद्रे, शासन निर्णय दि.२० फेब्रुवारी, २०१३ अन्वये स्थापन करण्यात आली आहेत. सदर मतदार मदत केंद्रांना दि. ०१ एप्रिल, २०२४ ते दि. ३१ डिसेंबर, २०२४ या कालावधीकरीता मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. लोकसभा सार्वत्रिक निवडणूका तसेच विधानसभा सार्वत्रिक निवडणूका विचारात घेऊन अपर मुख्य सचिव (सेवा) यांच्या अध्यक्षतेखालील उपसमितीने डाटा एंट्री ऑपरेटरच्या ४५० काल्पनिक पदांना दि.०१.०४.२०२३ ते दि.३१.१२.२०२४ या कालावधीकरीता मुदतवाढ दिली आहे. तथापि, सदर पदासाठी होणाऱ्या वित्तीय बाबीचे लेखांकन योग्य प्रकारे होण्यासाठी वित्तीय वर्षानुसार म्हणजेच दि. ०१.०४.२०२३ ते दि. ३१.०३.२०२४ या कालावधीकरीता सदर पदांना मुदतवाढ देण्याचा शासन निर्णय दि. ०४.०७.२०२३ रोजी निर्गमित करण्यात आला आहे. उर्वरित म्हणजेच दि. ०१.०४.२०२४ ते दि. ३१.१२.२०२४ या कालावधीकरीता राज्यातील ४५० मतदार मदत केंद्रांवर प्रत्येकी एक यानुसार मनुष्यबळासाठी, कामाच्या स्वरूपानुसार डाटा एन्ट्री ऑपरेटरची ४५० काल्पनिक पदे निर्माण करून बाह्य यंत्रणेद्वारे काम करून घेण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. यासाठी होणारा खर्च मुख्य लेखाशीर्ष १०३, मतदार याद्या तयार करणे व त्यांचे मुद्रण (००) (००) ०१) मतदार यादी तयार करणे व त्यांचे मुद्रण (अनिवार्य) (२०१५००३२), १०-कंत्राटी सेवा या उद्दिष्टाखालील सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-पहिला, उपविभाग-चार, मधील अनुक्रमांक ११ अनुसार प्रशासनिक विभागाला प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर हा शासन निर्णय उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२४०७०३१७०५२५७४०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MANOHAR RAMCHANDRA PARKAR

Digitally signed by MANOHAR RAMCHANDRA PARKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=c4c0810e9c94cf92d42a36d93c8f7b6ac18542c1ee758c9cfddcea906d9cf544, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FB43688343316856C0F7E793462127AA87FCE45724E87929C6889798CD7D2C62, cn=MANOHAR RAMCHANDRA PARKAR
Date: 2024.07.03 17:16:54 +05'30'

**( म. रा. पारकर )**
**उपसचिव व सह मुख्य निवडणुक अधिकारी,**
**महाराष्ट्र राज्य.**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, उप मुख्यमंत्री यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई
४. सर्व मा. विधान परिषद सदस्य / मा. विधानसभा सदस्य, विधानभवन, मुंबई.
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
६. सर्व मंत्रालयीन विभागांचे सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव
७. प्रधान सचिव, विधान परिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
८. विभागिय आयुक्त (सर्व)
९. जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अविकारी (सर्व),
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य १, मुंबई
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य २, नागपूर
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१३. निवासी लेखा परीक्षा, मुंबई,
१४. वित्त विभाग (आपुक कक्ष), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
१५. सर्व जिल्हा व कोषागार अधिकारी,
१६. कक्ष अधिकारी (निवडणूक-अर्थसंकल्प), सा.प्र.वि., मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
१७. निवडनस्ती (निवडणूक)